# आदिवासी विकास विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ७ जानेवारी २००४

## अधिसूचना

**भारताचे संविधान.**

क्रमांक आस्था. १०९९/प्र.क्र. ८९/का. १५.—भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद ३०९ च्या परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तीचा वापर करून आणि अस्तित्वात असलेले सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा अनुदेश अधिक्रमित करून, महाराष्ट्राचे राज्यपाल याद्वारे, महाराष्ट्र शासनाच्या आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारितील आयुक्त, आदिवासी विकास यांच्या नियंत्रणाखालील वसतिगृहातील गृहपाल (पुरुष) गट-" ब ", गृहपाल (स्त्री) गट-" ब " आणि आश्रमशाळा वसतिगृहातील अधीक्षक (पुरुष) गट-" क ", अधीक्षक (स्त्री) गट-" क ", पदाच्या सेवाभरतीचे विनियमन करणारे खालील नियम करीत आहेत, जसे,—

१. या नियमांना आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्त, आदिवासी विकास यांच्या नियंत्रणाखालील वसतिगृहातील गृहपाल (पुरुष) (अराजपत्रित) गट-" ब " गृहपाल (स्त्री) (अराजपत्रित) गट-" ब " आणि आश्रमशाळा वसतिगृहातील अधीक्षक (पुरुष) गट-" क ", अधीक्षक (स्त्री), गट-" क " पदांचे (सेवाप्रवेश नियम), २००४ असे संबोधण्यात यावे.

२. या नियमात संदर्भानुसार दुसरा अर्थ अभिप्रेत नसेल तर,—

(अ) " आश्रमशाळा " म्हणजे शासनाच्या आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्तालयामार्फत चालविल्या जात असलेल्या प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा ;

(ब) " आयुक्तालय " म्हणजे आदिवासी विकास आयुक्तालय ;

(क) " निवड समिती " म्हणजे शासनाने घोषित केलेली अपर आयुक्त, आदिवासी विकास यांच्या अध्यक्षतेखालील निवड समिती अथवा जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हा निवड समिती ;

(ड) " नर्सिंग कोर्स " म्हणजे शासन मान्यताप्राप्त संस्थेतून पूर्ण केलेली नर्सिंग मधील पदविका ;

(इ) " पदवी " म्हणजे मान्यताप्राप्त सांविधिक विद्यापीठाची पदवी ;

(फ) " विभाग " म्हणजे महाराष्ट्र शासनाचा आदिवासी विकास विभाग ;

(ग) " वसतिगृह " म्हणजे शासनाच्या आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील आदिवासी विकास आयुक्तालयामार्फत चालविली जात असलेली मुले किंवा मुलींची वसतिगृहे ;

(ह) " शासन " म्हणजे महाराष्ट्र शासन.

३. आयुक्तालयाच्या अधिपत्याखालील गृहपाल (पुरुष), गट-ब या पदावरील नियुक्ती पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येईल :—

(अ) आश्रमशाळेतील अधीक्षक हे पद धारण करणाऱ्या व त्या पदावर ३ वर्षांपेक्षा कमी नसेल एवढी नियमित सेवा झालेल्या पुरुष उमेदवारामधून, ज्येष्ठतेच्या आधारे पात्रतेच्या अधीन राहून योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीने, किंवा ;

(ब) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,—

(*i*) ज्यांचे वय ३० वर्षापेक्षा जास्त नाही :

परंतु, अगोदरच शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवाराच्या बाबतीत वयोमर्यादा ५ वर्षांनी शिथिलक्षम राहील.

(*ii*) जे कोणत्याही अतांत्रिक शाखेतील पदवी धारण करतात ;

(*iii*) जे शारीरिक शिक्षण शास्त्रातील पदवी किंवा शासनाने समकक्ष म्हणून घोषित केलेली अन्य अर्हता धारण करतात ;

(*iv*) जे उपखंड-(*ii*) व (*iii*) मध्ये विनिर्दिष्ट केलेली अर्हताप्राप्त केल्यानंतर. शासनाच्या कोणत्याही विभागातील पर्यवेक्षीय पदावरील कामाचा अथवा निरीक्षणाचा किमान २ वर्षांचा प्रत्यक्ष अनुभव धारण करीत असतील ;

(*v*) ज्यांना मराठी भाषेचे पर्याप्त ज्ञान आहे.

किंवा

(क) शासनाच्या अन्य विभागातील समकक्ष पद धारण करणाऱ्या सुयोग्य कर्मचाऱ्याची बदली करून.

४. आयुक्तालयाच्या अधिपत्याखालील गृहपाल (स्त्री), गट-ब या पदावरील नियुक्ती पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येईल :—

(अ) आश्रमशाळेतील अधीक्षक (स्त्री) हे पद धारण करणाऱ्या व त्या पदावर ३ वर्षांपेक्षा कमी नसेल एवढी नियमित सेवा झालेल्या उमेदवारामधून, ज्येष्ठता अधीन पात्रतेच्या आधारे पात्र ठरविलेल्या व्यक्तीच्या पदोन्नतीने, किंवा ;

(ब) विभागातील अथवा शासनाच्या अन्य विभागातील समकक्ष पद धारण करणाऱ्या सुयोग्य स्त्री उमेदवाराची बदली करून.

५. आयुक्तालयाच्या अधिपत्याखालील आश्रमशाळा वसतिगृहातील अधीक्षक (पुरुष), गट-क, या पदावरील नियुक्ती पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येईल :—

(अ) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने :—

(*i*) ज्यांचे वय ३० वर्षांपेक्षा जास्त नाही :

परंतु, अगोदरच शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवाराच्या बाबतीत वयोमर्यादा ५ वर्षांनी शिथिलक्षम राहील.

(*ii*) जे कोणत्याही अतांत्रिक शाखेतील पदवी धारण करतात ;

(*iii*) जे शारीरिक शिक्षण शास्त्रातील पदवी किंवा शासनाने समकक्ष म्हणून घोषित केलेली अन्य अर्हता धारण करतात ;

(*iv*) ज्यांना मराठी भाषेचे पर्याप्त ज्ञान आहे.

किंवा

(ब) वरील खंड (अ) मधील उपखंड (*ii*) मध्ये नामनिर्देशनासाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्या शासनाच्या अन्य विभागातील समकक्ष पद धारण करणाऱ्या सुयोग्य पुरुष कर्मचाऱ्याची बदली करून.

६. आयुक्तालयाच्या अधिपत्याखालील आश्रमशाळा वसतिगृहातील अधीक्षक (स्त्री), गट-क, या पदावरील नियुक्ती पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येईल :—

(अ) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,—

(*i*) जिचे वय ३० वर्षांपेक्षा जास्त नाही :

परंतु, अगोदरच शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवाराच्या बाबतीत वयोमर्यादा ५ वर्षांने शिथिलक्षम राहील.

(*ii*) उच्च माध्यमिक शालांत परीक्षा (एचएससी) उत्तीर्ण केली आहे ;

(*iii*) नर्सिंग मधील पदविका धारण केली आहे ;

(*iv*) ज्यांना मराठी भाषेचे पर्याप्त ज्ञान आहे.

किंवा

(ब) वरील खंड (अ) च्या उपखंड (*ii*) व (*iii*) मध्ये नामनिर्देशनासाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्या अन्य विभागातील समकक्ष पदावरील स्त्री कर्मचाऱ्याची बदली करून.

७. नियम क्रमांक ३ मध्ये नमूद पदावर पदोन्नतीने आणि नामनिर्देशनाने नियुक्तीचे प्रमाण ७५:२५ असे राहील.

८. नामनिर्देशनाने नियुक्ती होणारा उमेदवार दोन वर्षे कालावधीसाठी परिवीक्षाधीन राहील.

९. नियम क्रमांक ३, ४, ५ व ६ मध्ये नमूद केलेल्या पदावर नियुक्त केलेल्या व्यक्तीने अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल किंवा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल, तर त्या पदासाठी विहित विभागीय परीक्षा आणि हिंदी व मराठी भाषा परीक्षा त्यासंबंधी केलेल्या नियमानुसार उत्तीर्ण करणे आवश्यक असेल

१०. नियम क्रमांक ३, ४, ५ व ६ मध्ये नमूद केलेल्या पदावर नियुक्त होणाऱ्या व्यक्तीला शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेली संगणक हाताळणी/ वापराबाबतचे प्रमाणपत्र धारण करणेसंबंधी केलेल्या अथवा भविष्यात केल्या जाणाऱ्या नियमानुसार, धारण करणे आवश्यक राहील.

११. नियम क्रमांक ३, ४, ५ व ६ मध्ये नमूद केलेल्या पदावर नियुक्ती होणाऱ्या व्यक्ती राज्यात कोठेही बदलीस पात्र असतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**अ. नि. कुलकर्णी,**
शासनाचे उप सचिव.

**TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT**

Mantralaya Annexe, Mumbai 400 032, dated the 7th January 2004

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No. EST. 1099/C.R. 89/D-XV.—In exercise of the powers conferred by the proviso to Article 309 of the Constitution of India and in supersession of all existing rules orders or instruments made in this behalf, the Governor of Maharashtra, is hereby pleased to make the following rules regulating recruitment to the post of Warden (Male), Group-" B " and Warden (Female) Group-" B " of Hostels and superintendent (Male) Group-" C " and Suprintendent (Female) Group-" C " of the Ashram School Hostels under the Commissionerate of Tribal Development, Tribal Development Department of the Government of Maharashtra, namely :—

1. These rules may be called the Warden (Male), Group-" B ", (Non Gazetted) Warden (Famale) Group-" B " (Non-Gazetted) of Hostel and Superintendent (Male) Group-" C ", Suprintendent (Female) Group-" C " of the Ashram School Hostels under the Commissionerate of Tribal Development under the Tribal Development Department (Recruitment) Rules, 2004.

2. In these rules, unless the context required otherwise :—

(*a*) " Ashram School " means a Primary and Secondary Ashram School run by the Commissionerate, under the Tribal Development Department, of the Government ;

(*b*) " Commissionerate " means the Commissionerate of Tribal Development ;

(*c*) " Department, " means the Tribal Development Department of the Government ;

(*d*) " Degree " means a degree of a statutory University ;

(*e*) " Government " means the Government of Maharashtra ;

(*f*) " Hostel " means the Boys and Girls Hostel run by the Commissionerate, under the Tribal Development Department of the Government ;

(*g*) " Nursing Course " means a Diploma in Nursing from Government recognised institute ;

(*h*) " Selection Committee " means the Selection Committee constituted by the Government under the Chairmanship of Additional Commissioner Tribal Development or District Selection Committee headed by the Collector of the concerned District.

3. Appointment to the post of Warden (Male) Group-B under the Commissionerate shall be made either :—

(*a*) by promotion of a suitable male candidate on the basis of seniority subject to fitness, from amongst the candidates holding the post of superintendent (Male) in the Ashram School Hostels, having not less than three years regular service in that post ; or

(*b*) by nomination from amongst the candidates who :—

(*i*) are not more than, 30 years of age :

Provided that, the age-limit may be relaxed by five years in respect of candidates who are already in Government service.

(*ii*) possess a Degree in any non-technical faculty ;

(*iii*) possess a Degree of Bachelor in Physical Education or any other qualification declared by Government to be equivalent thereto ;

(*iv*) have experience of practical work or experience of inspection not less than 2 years of the supervisory post in any Department of the Government aquired after gaining qualification mentioned in sub-clause (*ii*) and (*iii*) of clause (*b*) ;

(*v*) have adequate knowledge of Marathi ;

*or*

(*c*) by transfer of a suitable person from equivalent post in any department of the Government.

4. Appointment to the post of Warden (Female) Group-B under the Commissionerate shall be made either :—

(*a*) by promotion of a suitable, female candidate on the basis of seniority subject to fitness, from amongst the persons holding the post of Superintendent (female) in the Ashram School Hostels of the

Department, having not less than three years regular service in that post ;

*or*

(*b*) by transfer of a suitable female candidate from equivalent post in any department of the Government.

5. Appointment to the post of Superintendent (Male) Group-C, under the Commissionerate in the Achram School Hostels shall be made either :—

(*a*) by nomination from amongst the candidates who—

(*i*) are not more than 30 years of age :

Provided that, the age-limit may be relaxed by five years in respect of candidates who are already in Government service.

(*ii*) Possess a Degree in any non-technical faculty ;

(*iii*) Possess a Degree of Bachelor of Physical Education or any other qualification declared by the Government to be equivalent thereto ;

(*iv*) Have adequate knowledge of Marathi.

*or*

(*b*) by transfer of a suitable male candidates holding equivalent post in any department of the Government who possessing the educational qualification mentioned in sub clause (*ii*) and (*iii*) of clause (*a*) above.

6. Appointment to the post of Superintendent (Female) Group-C under the Commissionerate in the Ashram School Hostels shall be made either :—

(*a*) by nomination from amongst the female candidates who :—

(*i*) are not more than 30 years of age :

Provided that, the age-limit may be relaxed by five years in respect of candidates who are already in Government service.

(*ii*) Have passed H.S.C. Examination ;

(*iii*) Possess the Diploma in Nursing Course ;

(*iv*) Have adequate knowledge of Marathi.

*or*

(*b*) by transfer of a suitable Female candidates holding equivalent post in any department of the Government possessing the educational qualification mentioned in sub clause (*ii*) and (*iii*) of clause (*a*) above.

7. Appointment to the posts mentioned in rule 3 by promotion and nomination shall be made in the ratio 75:25.

8. The candidates appointed to the posts by nomination shall be on probation for a period of two years.

9. A person appointed to any of the posts mentioned in rules 3, 4, 5 and 6 shall be required to pass the prescribed departmental examination and examination in Hindi and Marathi in accordance with the rules made in that behalf unless he has already passed or has been exempted from passing those examinations.

10. A person appointed to the posts mentioned in rules 3, 4, 5 and 6 should possess a certificate in Computer Operation prescribed by Directorate of Information Technology, of the Government in accordance with the rules made or may be made in this behalf.

11. A person appointed to any of the post mentioned in rules 3, 4, 5 and 6 shall be liable to be transferred anywhere in the State of Maharashtra.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

A. N. KULKARNI,
Deputy Secretary to Government.